# मार्टिन ल्यूथर किंग

सॅडलबॅक, मराठी : सुशील मेन्सन



# मार्टिन ल्यूथर किंग



सॅडलबॅक, मराठी : सुशील मेन्सन



मार्टिन ल्यूथर किंगला आपल्या वडिलांची प्रवचने ऐकायला आवडत असे. त्यांचे वडील पाद्री होते. ते लोकांना ताठ मानेने जगायला शिकवत.

एक दिवस मीसुद्धा असंच भाषण करेन.

मी अशा राष्ट्राचं स्वप्न पाहातो जिथे माझ्या मुलांची कदर त्यांच्या त्वचेच्या रंगावरून नाही तर त्यांच्या चरित्रावरून ठरेल.

मार्टिन ल्यूथर किंग भविष्यात एक प्रभावी वक्ता बनले. वॉशिंग्टन डी.सी. येथे सुमारे दोन लाख लोकांच्या समुदायासमोर त्यांनी भाषण केले. कोट्यवधी लोकांनी त्यांना टिव्हीवर ऐकले आणि पाहिले.

# 1. सुरुवातीची वर्षे


मार्टिन ल्यूथर किंग यांचा जन्म 15 जानेवरी 1929 मध्ये जॉर्जिया राज्यातील अटलांटा येथे झाला. त्यांचे पिता बॅप्टिस्ट चर्चचे पाद्री होते.


मार्टिनचा अधिकतर वेळ आपल्या भावंडांसोबत खेळण्यात जाई.
आईबापांनी त्याला शिकवले होते की एकमेकांवर प्रेम करणे हेच जगातील सर्वात महत्त्वाचे मूल्य आहे.


तू न्यूज़पेपर का विकतोयस?
यातून मी पुस्तकं विकत घेतो. जेवढा खर्च, तेवढीच कमाईसुद्धा हवी ना!
छोट्या वयातच मार्टिनने 'अटलांटा जर्नल' नावाचे वृत्तपत्र विकण्यास सुरूवात केली.


तुमचे आजोबा आफ्रो-अमेरिकन मुलांसाठी शाळा उघडणार होते. एका न्यूजपेपरने त्यांच्यावर टीका केली. मग काळ्या लोकांनी त्या न्यूजपेपरवर बहिष्कारच टाकला.
परिवाराकडून मार्टिनला आपल्या कुटुंबाचा इतिहास, बायबल आणि सामाजिक एकजूट यांचे आपल्या आयुष्यातील महत्त्व उमगले.

सहा वर्षांचा असतानाच मार्टिनने वर्णभेदाचे चटके अनुभवले. त्याची आई त्याला समजावत असे:




मार्टिनच्या एका गोऱ्या मित्राच्या आईने त्याला बजावले की आफ्रो-अमेरिकन असल्यामुळे त्याला या घरात येण्यास मनाई आहे.



मार्टिनच्या आईने त्याला गुलामी प्रथेविषयी सांगितले. गुलामीच्या काळात अमेरिकेत काळ्या लोकांचे जगणे मुश्किल होते.

मार्टिनचे वडील कुटुंबासोबत शेतात मेहनत करत.






सोळाव्या वर्षी मार्टिन दिवसा रेल्वे यार्डात काम करू लागला आणि रात्री शाळेत जाऊ लागला. शेवटी एकदाचा तो पाद्री बनला.







मार्टिनचे वडील खरं बोलायला घाबरत नसत.

मार्टिन एका वक्तृत्व स्पर्धेत भाग घेण्यास गेला. बसमध्ये गर्दी होती. ड्रायव्हरने मार्टिनला त्याची सीट गोऱ्या माणसाला देण्यास सांगितले. पण मार्टिन उठला नाही.




मग मार्टिनने बसमधून दोन तास उभ्याने प्रवास केला.

पंधराव्या वर्षी त्याला मोरहाउस कॉलेजमध्ये प्रवेश मिळाला.





सतराव्या वर्षी मार्टिनने प्रथमच धार्मिक प्रवचन दिले. अठराव्या वर्षी तो सहाय्यक पाद्री बनला. एकोणिसाव्या वर्षी त्याला कॉलेजची स्नातक पदवी मिळाली.

1948 साली मार्टिन पेनिसिल्व्हानियाला एक धार्मिक व्याख्यान देण्यासाठी गेला. शंभर विद्यार्थ्यांच्या वर्गात तो एकटाच आफ्रो-अमेरिकन होता.



1951 साली मार्टिनला क्रॉसर युनिव्हर्सिटीतून पोस्ट-ग्रॅज्युएट पदवी मिळाली. सोबत बोस्टन युनिव्हर्सिटीकडून स्कॉलरशीप मिळाली. बोस्टनमध्ये त्याची भेट कोरेटा स्कॉटशी झाली.







ती अतिशय गोड गात असे. तिला न्यू इंग्लंडच्या संगीत कॉलेजमध्ये शिकण्यासाठी स्कॉलरशीप मिळाली.







कोरेटा मार्टिनवर प्रेम करू लागली. लग्नानंतर मार्टिनच्या इच्छांनाच प्राधान्य द्यावे लागेल, हे ती जाणत होती.


मार्टिन, त्याचे वडील आणि कोरेटा या तिघांची तीन वेगवेगळी स्वप्ने होती.
देशाच्या उत्तर भागात संधी आहे गाण्याची. तिथे जाऊ.
मार्टिन अटलांटामध्ये धार्मिक प्रवचन देईल.
दक्षिण भागात माझं स्वतःचं चर्च असेल.


18 जून 1953 रोजी, मार्टिन आणि कोरेटा यांचे अलाबामा येथे लग्न झाले.
ते बोस्टनला परतणार का?
हो, कोरेटा तिथे संगीत शिकेल आणि मार्टिन डॉक्टरेटचा अभ्यास करेल.


पंचविसाव्या वर्षी मार्टिन मॉन्टगोमेरीच्या डेक्स्टर अवेन्यू चर्चमध्ये पाद्री बनला.
तुझं चर्च! अभिमान वाटतो मला तुझा.
तू तिथे गाशील तेव्हाच मला समाधान वाटेल.


मॉन्टगोमेरीमध्ये मार्टिनची भेट रेव्हरंड राल्फ अबर्नथीशी झाली.
तू खूप वेगळा आहेस. तुला चक्क शिकायला आवडतं!
तुम्ही नक्कीच गंमत करताय!

## 2. बसवर बहिष्कार
















काही गोरे लोक काळ्या लोकांना “जिम-क्रो” म्हणत. “जिम-क्रो” नियम पिण्याचे पाणी, शौचालये, बस अशा ठिकाणी लागू होत. या नियमांनी वर्णभेदाचे अस्तित्व राखले होते.

1863 साली अब्राहम लिंकनने गुलामगिरी संपवली. पण तरीही आफ्रिकन-अमेरिकन लोकांना नागरिक म्हणून सन्मानाने वागवले जात नसे.

VOTE

गोऱ्या माणसाच्या सहीची शिफारस आणा. मगच तुम्ही वोटिंग करू शकता.

दक्षिण अमेरिकेने आफ्रो-अमेरिकन लोकांना निवडणुकीपासून दूर ठेवण्यासाठी स्वत:चे नियम बनवले.

माझ्याकडे कॉलेजची पदवी आहे.

त्याला काहीच किंमत नाही इथे.

आफ्रिकन-अमेरिकन माणसाला नोकरी मिळणेही कठीण होते.

त्यांनी माझं काही ऐकूनच नाही घेतलं.

कोर्ट नेहमी काळ्या लोकांनाच दोषी ठरवतं.

काळजी करू नकोस. आपण गोरे आहोत. पोलीस आपल्याला त्रास देणार नाहीत.

आपण पुढच्या सीटचे पैसे भरले तरी मागे बसा म्हणतायत, हे योग्य नाही.

हो, कधीतर ड्रायव्हर आपल्याकडून पैसे घेतो आणि आपल्या तोंडावर दरवाजा बंद करून निघून जातो.

आफ्रो-अमेरिकन लोकांना बसच्या मागच्या दाराने चढावे लागे. मागच्या पाच रांगांमध्ये कुणी गोरा माणूस बसलेला नसेल तरच ते त्यावर बसू शकत.




1 डिसेंबर 1955 रोजी रोजा पार्क्स दिवसभराच्या कामाने दमून निघाली. मॉन्टगोमेरीत एका बसमध्ये ती चढली.

रोजाने सीटवरून उठण्यास नकार दिला. मग ड्रायव्हरने पोलिसांना बोलावले.








डॉ. किंगने सर्व आफ्रो-अमेरिकन लोकांना याबाबत पत्रे लिहून कळवले. विद्यार्थ्यांनी ही पत्रे लोकांपर्यंत पोहोचवली.




पत्र न्यूजपेपरमध्ये छापून आले. आफ्रो-अमेरिकन लोकांनी बसवर टाकलेल्या बहिष्काराची बातमी सर्वत्र पसरली.



डिसेंबर 5, सोमवारी कुणीही आफ्रो-अमेरिकन बसमध्ये चढला नाही.

घोड्यावर बसता?

नको.

कायदा मोडल्याबद्दल रोजा पार्क्सला दंड भरावा लागला.

दंडाविरुद्ध मी अपील करेन.

त्याच दिवशी एक नवीन संघटना उदयाला आली.

याला मॉन्टगोमेरी इम्प्रुव्हमेंट असोसिएशन (MIA) म्हणू.

डॉ. किंगना संघटनेचा अध्यक्ष म्हणून निवडले. सदस्यांची नावे गुप्त ठेवावीत, अशी सूचना कुणीतरी केली.

नाही, आपलेही हक्क आहेत, हे जगाला कळू दे.

त्या रात्री त्यांची चर्चमध्ये मीटिंग झाली. चर्च पूर्ण भरला होता आणि बाहेर 4000 लोक उभे होते.












संपूर्ण देशातून पैसा गोळा झाला. बहिष्कार सुरू राहिला. मॉन्टगोमेरीतील व्यापाऱ्यांनी तक्रार केली. न्यूज़पेपर, टीव्ही, पत्रके यांच्यामुळे MIA प्रसिद्ध झाली. मे महिन्यात न्यूयॉर्क शहराच्या मॅडिसन स्क्वेअर भागात आफ्रो-अमेरिकन लोकांनी एक मुक्ती मोर्चा काढला.



मॉन्टगोमेरीच्या अधिकाऱ्यांनी आफ्रो-अमेरिकन लोकांनी स्वत:साठी सुरू केलेल्या वाहतुकीला बेकायदेशीर ठरवले. कोर्टात याचा निकाल लागला.

डॉ. किंग या बहिष्कार आंदोलनाचे नेता होते. त्यामुळे त्यांना कोर्टात हजर राहावे लागले. निकाल त्यांच्या बाजूने लागला.




मॉन्टगोमेरीमध्ये आफ्रो-अमेरिकन लोकांनी सुप्रीम कोर्टचा निकाल पोहोचण्याची वाट बघितली. दरम्यान बसमध्ये शांतपणे कसे वागावे, याचा शाळा आणि चर्चमध्ये त्यांनी सराव केला.









# 3. धरणं, आंदोलन आणि मुक्ती

जेव्हा आफ्रिकेतील गोल्ड-कोस्ट (घाणा) देश ब्रिटनपासून मुक्त झाला तेव्हा डॉ. आणि मिसेस किंग तिथे गेले.

आता काळे लोक आपल्या जमिनीचे मालक आहेत.

आता आफ्रिकी-अमेरिकन या नव्या देशाला तांत्रिक मनुष्यबळ पुरवू शकतात.




काही नेत्यांनी *साउदर्न ख्रिश्चन लीडरशिप कॉन्फरन्स* (SCLC) स्थापन केली.

आपण उत्तर आणि पश्चिमेच्या काळ्या लोकांनाही सोबत घेऊ.

*द नॅशनल असोसिएशन फॉर द ॲडवान्समेंट ऑफ कलर्ड पीपल* (NAACP) ने वॉशिंग्टनमध्ये एक प्रार्थना रॅली काढली. त्यात तीस हजार लोक होते. डॉ. किंग सर्वात शेवटी बोलले.




भाषणानंतर लोकांनी खूप टाळ्या वाजवल्या. त्यांना डॉ. किंगकडून आणखी ऐकायचे होते. डॉ. किंग त्यांचे नेता होते. ते येशू आणि गांधी यांचा मार्ग अनुसरत होते.

* any long journey to a shrine or sacred place

1959 मध्ये डॉ. आणि मिसेस किंग महात्मा गांधींच्या भारतात आले.




ते प्रथम पंतप्रधान नेहरूंना भेटले.




आता डॉ. किंग एकतीस वर्षांचे होते. काही लोक त्यांची स्तुती करत तर काही टीका करत. ते पूर्ण वेळ SCLC चे काम करू लागले. जानेवारी 1960 मध्ये ते आपला चर्च सोडून अटलांटाला गेले.

काळा गांधी.

गोऱ्या लोकांना आपण हिंसेने नव्हे तर प्रेमाने जिंकू.

कम्युनिस्ट !

तो गोरा बनू पाहातोय.

एक क्रांतिकारक !

त्यांच्यामुळे आम्ही ताठ मानेने जगतोय.

थोर माणूस.

फेब्रुवारी 1960 मध्ये एक नवी मोहीम सुरू झाली.

नॉर्थ कॅरोलिनात, आम्ही काळ्या लोकांना सेवा देत नाही.

म्हणजे आम्ही इथून जेवण फक्त विकत घ्यायचं, खायचं नाही!

चार दिवसांनंतर गोऱ्या लोकांनीही आंदोलनात भाग घेतला.

आम्ही काळ्या लोकांना जेवण वाढत नाही.

मग आम्ही काही न मागवता इथेच बसून राहू.

एका पत्रकाराने या धरणं आंदोलनाबद्दल लिहिले. मग दक्षिण भागात काळे-गोरे विद्यार्थी स्थानिक रेस्टॉरन्टमध्येच धरणं देऊन बसले.

तुमची आंदोलनाची पद्धत छानच! SCLC तुम्हाला मदत करेल.

आम्ही स्वतःला *स्टुडंट नॉन-व्हायोलंट कॉर्डिनेशन कमिटी* SNCC म्हणवतो.

मी काळ्या लोकांशी सहानुभूतीने वागतो.

तुम्ही आम्हाला खरेदी तर करू देता. पण वर्णभेद बाळगता. आम्ही इथे काहीही खाणार नाही.

SNCC चे कार्यकर्ता अमेरिकेत एका संपूर्ण पिढीचे रोल-मॉडल बनले.

मे महिन्यात “मुक्त-यात्रा” आयोजित करण्यात आली. गोरे आणि काळे सोबतीने बसमधून दक्षिण भागात गेले. तिथे त्यांनी रेस्टॉरन्टमध्ये एकत्र जेवण केले.

पोलीस फक्त बघत राहिले.

एक जमाव येतोय. त्यांचाही बंदोबस्त करू.

अलाबामामध्ये गोऱ्यांनी प्रवाशांवर हल्ला केला.

मॉन्टगोमेरीमध्ये डॉ. किंग यांनी काही लोकांना “मुक्त-यात्रा” बद्दल सांगितले. गोऱ्यांनी हत्यारासह त्यांच्या चर्चला घेराव घातला आणि लोकांना बाहेर पडू दिले नाही.

आपल्याला यश मिळेल.

अटॉर्नी जनरल रॉबर्ट केनेडी यांनी गव्हर्नरना चर्चमध्ये अडकलेल्या लोकांना सुरक्षा पुरवण्याचा आदेश दिला.

“मुक्त-यात्री” आपल्या मोहिमेत यशस्वी झाले. अमेरिकन सरकारने बस, ट्रेन, विश्रामगृहे यांसारख्या ठिकाणी वर्णभेद बेकायदेशीर ठरवला.

डॉ. किंग यांनी आपल्या नेत्यांना एकत्रित काम करण्याचे आवाहन केले.

आंदोलन!

NAACP

नवे कायदे करण्यासाठी कोर्टाची पायरी चढू.

SNCC
STUDENT

URBAN LEAGUE
FOUNDED IN 1910

CORE
CONGRESS OF RACIAL EQUALITY
-1942-

आफ्रिकन-अमेरिकन लोकांना शिक्षण आणि नोकऱ्या द्या.

चांगल्या नोकऱ्या द्या.

## 4. बर्मिंगहॅम मोर्चे

एप्रिल 1963 मध्ये डॉ. किंग यांनी अलाबामा राज्यातील बर्मिंगहॅम शहरात एक मोर्चा काढला. दक्षिणेतील या शहरात गोऱ्या लोकांनी आफ्रो-अमेरिकन लोकांवर खूप अत्याचार केले होते.

रेव्हरंड अबर्नथी आणि मी गुड-फ्रायडेच्या दिवशी मोर्चा काढू.

ही माझी तेरावी अटक!

तुम्ही सोबत असाल तर जेलमध्येही आनंदाने राहीन.

त्यांना परवानगीशिवाय मोर्चा काढल्याबद्दल अटक झाली.

पण यावेळी डॉ. किंगना वेगळ्या कोठडीत ठेवले. ते ना कुणाशी फोनवर संवाद साधू शकत, ना कुणाला भेटू शकत. काही प्रोटेस्टंट, कॅथलिक आणि ज्यू पाद्र्यांनी न्यूजपेपरला पत्र लिहिले की हा मोर्चा योग्य नाही.

या शहाण्या लोकांना बर्मिंगहॅममधल्या काळ्या लोकांच्या दयनीय स्थितीबद्दल आठवण करून द्यायला हवी.

डॉ.किंग यांनी "बर्मिंगहॅम जेलमधून लिहिलेली पत्रे" खूप लोकप्रिय झाली.

कोरेटा स्कॉट किंग डॉ.किंगच्या अटकेने खूप काळजीत पडल्या. त्यांनी राष्ट्रपतींना फोन करण्याचा प्रयत्न केला. मग त्यांनाच दोन महत्त्वाचे फोन आले.







दुसरा फोन होता, अटॉर्नी जनरल रॉबर्ट केनेडींचा. डॉ. किंगच्या सुटकेची बातमी देणारा.







जेलमध्ये डॉ. किंगने ठरवले की बर्मिंगहॅममधील काळ्या लोकांना चांगल्या सोयी-सवलती मिळण्यासाठी मुलांनाही आंदोलनात सहभागी करायचे.







सुमारे एक हजार मुले चर्चमध्ये जमा झाली. बाहेर पोलिसांचा पहारा होता. मुले लहान-लहान गट करून तिथून निघाली. दुसऱ्या कुठल्या तरी ठिकाणी पुन्हा जमायचे असे त्यांनी ठरवले.
आता पोलीस त्यांना पकडू शकणार नाहीत.


पण जेव्हा मुले तिथे पोहोचली तेव्हा पोलिसांनी त्यांना अटक केली.
तुझं वय काय?
सात वर्षे.


पुढच्याच दिवशी क्रूर पोलीस कमिशनर “बुल” कॉनरच्या आदेशाचे पालन झाले.
मुले चर्चमधून निघाली तेव्हा त्यांच्यावर फायरमनच्या पाईपमधून पाण्याचा फवारा सोडला. त्यांच्यावर कुत्रेही सोडले.


आपली हत्यारे उचला आणि घरी परत जा. मुलांना हिंसेची गरज नाही.
“बुल” कॉनरला आफ्रो-अमेरिकन लोकांची घृणा वाटे.
एक मोठी दंगल होण्याचे टळले.


बघा, ते आपल्या मुलांशी कसे वागतायत?
अरे देवा! हे सगळं अमेरिकेत होतंय! खरं वाटत नाही!
अमेरिकेतील लोकांना हे बघून मोठा धक्का बसला.

आफ्रो-अमेरिकन लोकांनी गोऱ्यांच्या 21 चर्चमध्ये प्रार्थना करण्याचा प्रयत्न केला.

आम्हीसुद्धा ख्रिश्चन आहोत!

इथे फक्त गोरेच प्रार्थना करू शकतात.

फक्त चार चर्चने आफ्रो-अमेरिकन लोकांना आत प्रवेश दिला.

पोलिसांनी त्यांच्यावर पाणी फेकले. रेव्हरंड बिलपसने लोकांना गुडघ्यावर बसून प्रार्थना म्हणण्यास सांगितले.

पाणी मारा!

पण फायरमनने पाईपमधून पाणी मारण्यास नकार दिला. पोलिसांनी लोकांवर कुत्रे सोडण्याचे नाकारले.

राष्ट्रपती केनेडीच्या मंत्रिमंडळाने बर्मिंगहॅमच्या व्यापाऱ्यांना शांतता राखण्याची विनंती केली.








# 5. माझं एक स्वप्न आहे

बर्मिंगहॅमच्या आंदोलनातून स्फूर्ती घेऊन अमेरिकेतील 800 शहरांमध्ये मोर्चे निघाले.

वोटिंगचा हक्क द्या!




ए. फिलिप रॅण्डॉल्फ या रेल्वे हमालांच्या प्रमुखाने काळ्या लोकांची मीटिंग बोलावली.



मला वॉशिंग्टनमध्ये एक शांती-यात्रा काढायचीय. यामुळे काँग्रेसला काळ्या लोकांची एकजूट दिसेल.

28 ऑगस्ट 1963 रोजी वॉशिंग्टनमध्ये शांती-यात्रा काढण्यात आली.
त्यात संपूर्ण अमेरिकेतून सुमारे अडीच लाख लोक सामील झाले. त्यात गोरे लोकही होते



हा एक अविस्मरणीय क्षण होता. यावेळी रेव्हरंड मार्टिन ल्यूथर किंगने केलेले शेवटचे भाषण लोक कधीही विसरू शकले नाहीत.



माझं एक स्वप्न आहे की एक दिवस जॉर्जियाच्या लाल टेकड्यांवर पूर्वीच्या गुलामांची मुलं आणि त्या गुलामांच्या मालकांची मुलं गुण्यागोविंदाने एकत्र खेळतील.

आंदोलनामुळे बदल घडत होते. काही रेस्टॉरन्टमध्ये वर्णभेद पाळणे बंद झाले. काही आफ्रो-अमेरिकन लोकांना चांगल्या नोकऱ्याही मिळाल्या. पण बराच रक्तपातही झाला.

सप्टेंबरमध्ये बर्मिंगहॅममध्ये कुणीतरी आफ्रो-अमेरिकन चर्चवर बॉंब टाकले. त्यात चार काळी मुले मारली गेली.



22 नोव्हेंबर 1963 रोजी राष्ट्रपती केनेडींची हत्या झाली.




जानेवारी 1964 मध्ये डॉ. किंगना *टाइम* मासिकाने *“मॅन ऑर द इयर”* घोषित केले.




जुलै 1964 मध्ये राष्ट्रपती लिंडन जॉन्सन यांनी अमेरिकन कॉंग्रेसमार्फत *सिव्हिल राइट्स बील* (नागरी हक्क कायदा) संमत करून घेतला.




ऑक्टोबर 1964 मध्ये नॉर्वेच्या नोबेल समितीने डॉ. किंग यांना शांततेचा *नोबेल पुरस्कार* प्रदान केला..

डॉ. किंग आणि त्यांचे कुटुंबीय नॉर्वेला गेले. वयाच्या 35 व्या वर्षी हा पुरस्कार मिळवणारे ते सर्वात तरूण व्यक्ती होते.



किंग कुटुंबीय अमेरिकेसोबत साऱ्या विश्वाच्याच इतिहासात अमर झाले.

अलाबामातील सेल्मा येथे शेरीफ जिम क्लार्क अजूनही आफ्रो-अमेरिकनांबाबत भेदभाव ठेवू पाहात होते.

आम्ही वोट देण्यासाठी आलोय.

आलात तसे परत जा.

मार्च 1965 मध्ये डॉ. किंगने आपल्या लोकांना वोटिंगचा हक्क मिळण्यासाठी सेल्मा ते माँन्टगोमेरी असा पाच दिवसांचा मोर्चा काढला.

वीस हजार लोकांचा मोर्चा!

मोर्चात काही प्रसिद्ध गोऱ्या व्यक्तिसुद्धा आहेत.

राष्ट्रपती जॉन्सनने काँग्रेसला वोटिंगच्या हक्काचा कायदा संमत करण्याचे आवाहन केले.

आफ्रिकन-अमेरिकन लोकांना न्याय द्यायला हवा. देशातल्या प्रत्येकालाच वोटिंगचा हक्क असला पाहिजे.

गव्हर्नर वॉलेसने डॉ. किंगचे एक भाषण ऐकले.

गोऱ्यांनी आमच्यावर लाठीहल्ला केला तर आम्ही ते कॅमेऱ्याने शूट करू, टिव्हीवर दाखवू.

1965 साली राष्ट्रपती जॉन्सनने *वोटिंग राइट्स ॲक्ट* वर सही केली.

आजचा दिवस मुक्ती आणि आनंदाचा!

आता प्रत्येक प्रौढ काळ्या व्यक्तीला वोटिंगचा हक्क आहे. कोणतेही राज्य त्यांना अडवू शकत नाही.

1966 मध्ये डॉ. किंग शिकागोला गेले. तिथे आफ्रो-अमेरिकन लोक किती वाईट अवस्थेत राहातात हे त्यांनी पाहिले.

घरभाडं खूप जास्त आहे.

उंदीर खूप झालेत. मुलांना चावतात ते!

मेयर डॅली, चतुर राजकारणी होते.

मला येथे दंगा वगैरे नकोय. असा कायदा करू की ज्यामुळे काळे लोक त्यांना पाहिजे तिथे राहू शकतील.

डॉ. किंग

लढण्यात

देत. तरीही

अमेरिकन

अज्ञानी

उन्हाळ्यात

लुटमार

डॉ. किंगने व्हिएतनाम युद्धाविरुद्ध आवाज उठवला. यामुळे राष्ट्रपती जॉन्सन नाराज झाले.

नागरी हक्क आणि शांतता आंदोलन एकाचवेळी सुरू राहू शकत नाही.

कांग्रेस, काळ्या लोकांचे जीवनमान सुधारू शकली नाही.

वॉशिंग्टनमध्ये गरिबी निर्मूलनाचा एक मोर्चा काढू. यात अमेरिकन आदिवासी, मेक्सिकन, गरीब गोरे लोक यांनाही सामील करू.

डॉ.

तेव्हा

वयाच्या एकोणचाळीसाव्या वर्षी डॉ. किंग थकून गेले होते. ते दर महिन्याला सुमारे दहा हजार मैल प्रवास करत, ठिकठिकाणी भाषणे देत, मोर्च्यांचे नेतृत्व करत. पण ते हिंसेच्या विरुद्ध होते.

मेम्फिसमध्ये मुसळधार पावसामुळे सफाई कामगार कामावर गेले नाहीत. पण गोरे कामगार सोडून बाकी साऱ्यांना कामावरून काढून टाकले.

इथे काळ्या लोकांना वेगळा न्याय आहे.

ठीकाय, मी याचा विरोध करेन.

4 एप्रिल 1968 रोजी जेम्स अर्ल रे याने गोळी मारून डॉ. किंगची हत्या केली.

कोरेटा स्कॉट किंग धीराने आपल्या मुलांना म्हणाली, "तुमच्या पित्याची हत्या झाली असली तरी त्यांचे विचार मात्र जिवंत राहातील."

संपूर्ण जगाने डॉ. किंग यांच्या मृत्यूवर शोक व्यक्त केला. दोन लाख लोकांनी एक भव्य मोर्चा काढला आणि *"व्ही शाल ओव्हरकम्"* हे स्वातंत्र्यगीत गायले.

त्यांचे दफन केले त्या जागी गुलामीच्या एका जुन्या गीताचे शब्द कोरलेयत: "मुक्त झालो अखेरी, मी मुक्त झालो अखेरी, देवा तुझे शतश: आभार, मी मुक्त झालो अखेरी."

सावकाश पण ठामपणे डॉ. मार्टिन ल्यूथर किंगने आपल्या लोकांना मुक्तीचा मार्ग दाखवला. आपल्या आंदोलनातून त्यांनी अमेरिकन लोकांच्या मनाला साद घातली. साऱ्या जगाला सोबत घेऊन त्यांनी आपले स्वप्न साकार केले.

समाप्त